मठपिंप्री क्र.२ को.प. बंधारा, ता. जि.अहमदनगर या योजनेस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा २०१४/(७३/२०१४)/ ल.पा.१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १३ जून, २०१८

संदर्भ:-

**१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ,पुणे यांचा निर्णय क्र.२९६(२३९/१९९६)/ को.प. बंधारा मठपिंप्री क्र.२/प्रशा-३,दिनांक २७/१०/१९९६**

**२)महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे जा.क्र.मकृखोविमं/२१४/(१९५/२०१४) /प्रशा-२/२००३, दि.०५/०३/२०१४ चे पत्र.**

**३) वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-३२ यांचे पत्र क्र.व्यअस- २०१८/प्र.क्र.२७/अर्थसं-२, दिनांक २७ फेब्रुवारी,२०१७**

प्रस्तावना:-

मठपिंप्री क्र.२ को.प. बंधारा, ता. जि.अहमदनगर या योजनेस संदर्भ क्र.१ अन्वये एकूण रु.५९.९९ लक्ष इतक्या किंमतीस मुळ प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. सदर मुळ प्रशासकिय मान्यता प्रस्ताव १९९५-१९९६ च्या दरसुची नुसार तयार करण्यात आलेला होता. प्रकल्पाचे काम सुरु असतांना दरसूचीतील वाढीमुळे,जास्त दराची निविदा स्विकृती,भूसंपादन खर्चातील वाढ,संकल्पचित्रातील बदलामुळे, अपुऱ्या तरतूदी व अपुरे सर्वेक्षण तसेच इतर कारणे व मूळ प्रमामुळे वगळलेल्या तरतुदीमुळे सन १९९९-२००० ची दरसुची वापरुन सुधारित अंदाजपत्रक तयार करुन रु.८६.१४ लक्ष इतक्या किंमतीस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ,पुणे यांच्या संदर्भ क्र.२ च्या पत्रान्वये शासनास सादर करण्यात आला आहे. सदर प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव व्यय अग्रक्रम समितीच्या दि.१५ फेब्रुवारी,२०१८ रोजी झालेल्या बैठकीत मान्य करण्यात आला आहे.त्यानुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय

१) मठपिंप्री क्र.२ को.प. बंधारा ता. जि.अहमदनगर या योजनेस (सन १९९९-२००० ची दरसूचीवर आधारित) अंदाजित रु. ८६.१४ लक्ष (रुपये शाऐंशी लक्ष चौदा हजार फक्त ) या किंमतीस प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. (कामासाठी रु. ७८.८९ लक्ष व अनुषंगिक खर्चासाठी रु.७.२५ लक्ष ). अंदाजित किंमतीचा गोषवारा सोबत जोडलेल्या परिशिष्ट "अ" मधील विवरणपत्रात देण्यात आला आहे.

सदर प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१.१ सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्वयी करण्याच्या विविध टप्प्यावर झालेल्या अनियमिततेस मान्यता गृहित धरता येणार नाही.

१.२ या योजनेबाबत चालू असलेल्या अथवा प्रस्तावित विभागीय चौकशीची कार्यवाही पूढे चालू ठेवावी.सदर सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहचणार नाही.

१.३ सदर योजनेसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. या संदर्भात प्रचलित शासन निर्णय, CWC ची मार्गदर्शक तत्वे, वित्त अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपद्धती याची काटेकोरपणे अंबलबजावणी करण्यात यावी.

२) या योजनेच्या कामावरील खर्च मुख्य लेखाशिर्ष मागणी आय ५ "४७०२, लहान पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च १९०,सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (००) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर क्षेत्रातील गुंतवणूका,(००)(०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (ल.पा.) (उर्वरित महाराष्ट्र) (४७०२ ४७९४) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाच्या मंजूर अनुदानातुन भागविण्यांत यावा.निधीची मंजूरी मिळाल्याशिवाय या योजनेच्या कामावर कोणत्याही कामाचा खर्च करू नये.

३) हा शासन निर्णय,नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२०/का.१४३४ दि.०१/०२/२०१७ आणि वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१३९/व्यय १२ दि.०३/०७/२०१७ अन्वये तसेच व्यय अग्रक्रम समीतीने दि. १५ फेब्रुवारी,२०१८ रोजी संपन्न झालेल्या बैठकीत दिलेल्या मंजूरीनुसार व संदर्भ क्रं २ नुसार याबाबतच्या निर्गमीत केलेल्या इतिवृत्तानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

४) या योजनेस प्रदान केलेली प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता लपा कार्यासनाच्या प्रशासकीय मान्यता नोंदवहीतील अ.क्र. १७६ वर नोंदविण्यांत आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१३१६५५१०३०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Dharane
Mallikarjun Irappa

Digitally signed by Dharane Mallikarjun Irappa
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42153c779eba7d6ca17364b6d37857b105b20a01d36c767c7ed1d7d278837bd7, cn=Dharane Mallikarjun Irappa
Date: 2018.06.13 17:02:59 +05'30'

**(म.ई.धरणे)**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अंदाजित किंमतीच्या गोषवाऱ्यासह :-
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
३. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपुर.

४. वित्त विभाग (व्यय-१२)मंत्रालय, मुंबई ३२

५. नियोजन जिभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई ३२.

६. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.

७. मुख्य अभियंता(वि.प्र.), जलसंपदा विभाग, पुणे.

८. आंतर वित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

९. जिल्हाधिकारी अहमदनगर, अहमदनगर.

१०.अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,पुणे.

११.कार्यकारी अभियंता, कुकडी प्रकल्प भू-विकास विभाग क्र.१, अहमदनगर

१२.उपसचिव (लपा)/ अवरसचिव(लपा) /उपअभियंता(लपा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३.कार्यासन अर्थ १-२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४.विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क, महासंचालक, मंत्रालय, मुंबई.

१५.लपा संग्रहार्थ

## परिशिष्ट "अ"

शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा २०१४/(७३/२०१४)/ ल.पा.१ दिनांक १३/०६/२०१८ चे सहपत्र
मठपिंप्री क्र.२ को.प. बंधारा, ता. जि.अहमदनगर च्या प्रथम सुधारित प्रशासकिय मान्यतेचा
अंदाजित किंमतीचा गोषवारा

| अ.क्र. | उपशिर्ष | किंमत (रु.लक्ष) |
|---|---|---|
| | अ - प्राथमिक कामे | ०.०० |
| | ब - भू संपादन | ६.४४ |
| | सी - कामे | ७२.४५ |
| | के- इमारती | ०.०० |
| | ओ-संकीर्ण | ०.०० |
| | पी-देखभाल | ०.०० |
| | आर-दळणवळण | ०.०० |
| | अनुषंगिक खर्च | ७.२५ |
| | **एकूण** | **८६.१४** |

### ठळक वैशिष्टे

| | | |
|---|---|---|
| १. योजनेची सिंचन क्षमता | - | २७० हेक्टर |
| २. एकूण पाणी साठा | - | ८३३.३३ स.घ.मी. |
| ३. पाणी साठ्याची प्रती स.घ.मी किंमत | - | रु.१०३३७/-स.घ.मी. |
| ४. लाभव्यय गुणोत्तर | - | १.८४ |

Dharane
Mallikarjun Irappa

Digitally signed by Dharane Mallikarjun Irappa
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42153c779eba7d6ca17364b6d37857b105b20a01d36c767c7ed1d7d278837bd7, cn=Dharane Mallikarjun Irappa
Date: 2018.06.13 17:03:11 +05'30'

**(म.ई.धरणे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**